



# ORIGAMI

The aim of this folder is to introduce 'ORIGAMI' an art of paper folding, to you.

ORIGAMI has been practiced in Japan for centuries and is becoming popular all over the world.
This folder provides a step by step guide to ORIGAMI, with the signs and symbols.

Always keep a piece of paper with you and try out different folds. Once you have learnt these folds you will be able to develop many models of ORIGAMI.

Try this paper folding art and develop a fascinating hobby to derive pleasure and fun for years.

Indu Tilak

## 'ओरीगामी'

ओरिगामी या जपानी कलेचा भारतीयांना परिचय करून देण्यासाठी हे संकलित फोल्डर मी तयार केले आहे. ओरिगामी ही कला जपानमध्ये अनेक शतकांपासून प्रचारात आहे. ओरिगामी या शब्दाचा अर्थ कागदाच्या घड्या घालून कलाकृती निर्माण करणे.

जपानपुरती ही कला आता मर्यादित राहिली नसून संपूर्ण जगात तिचा प्रचार होत आहे. मार्गदर्शनाअभावी भारतीय या कलेचा आनंद उपभोगण्यात मागे पडू नयेत असा मनात हेतु आहे.

कागदाचा तुकडा कायम जवळ ठेवून सतत घड्या पाडण्याचा सराव करीत रहा. मी हेच करत आले व कला संपादनाची हीच गुरुकिल्ली आहे असे मी म्हणू शकते.

हे फोल्डर नवीन काही नसून मूलभूत अशा घड्या व त्यापासून कलाकृतींची निर्मिती कशी करता येते हे दाखविण्याचा प्रयत्न आहे.

जगातील अनेक देशामधून अनेक कलाकारांनी मूलभूत घड्यांच्या आधारे नवनवीन कलाकृती तयार केल्या आहेत. आपणही या कलेत, सरावाने कलाकृती निर्माण करून मौलिक भर घालूया व कलाविकास साधूया.

इन्दू टिळक







राष्ट्रीय शैक्षणिक धोरणानुसार महाराष्ट्र शासनाने मंजूर केलेल्या इयत्ता पहिली व दुसरीच्या अभ्यासक्रमानुसार योजलेले पाठ्यपुस्तक

(शासन निर्णय क्र. PTC/ 10 ८७/३५५/८७ मा शि - ५, दिनांक ५ मे, १९८९ अन्वये मंजूर) क्रमांक : उपुक्र/१०८७/३०२६७/४/म

टिळक बन्धु प्रकाशन, पुणे-३०

PUBLISHERS : TILAK BROTHERS, 568, NARAYAN PETH, PUNE-411 030




11 ११

12 १२

**सर्व कलांचे अधिष्ठान तू श्री गणराया गजानना ।**
**वंदन करूनी तुला, दावितो कलादर्शन जना ।**


निर्माती : इंदू टिळक
By : Indu Tilak



# अनुक्रमणिका — Contents




प्रकाशक
**श्री. दी. ज. टिळक**
**श्री. शै. श्री. टिळक**
**(टिळक बंधू)**
५६८ नारायण पेठ, पुणे-३०




**मुद्रक : केसरी मुद्रणालय**
**५६८, नारायण पेठ,**
**पुणे ४११ ०३०**




**किंमत २० रुपये**

# Signs & Symbols खुणा व चिन्हे

VALLEY FOLD
व्हॅली फोल्ड





TURN OVER
उलटे करा



MOUNTAIN FOLD
माउंटन फोल्ड





Enlarge
मोठी आकृति



CREASE
क्रिज






OPEN OUT
उलगडा



INSIDE VIEW





PUSH IN, SQUASH, SINK
दाबा



कापा






FOLD OVER & OVER
परत परत घडी घाला




FOLD UNDER
आंत घडी घाला



FOLD IN FRONT
पुढे घडी घाला




FOLD & UNFOLD TO CREASE
घडी घाला व उलगडा




FOLD BEHIND
मागे घडी घाला




HOLD HERE
धरा



FOLD 3 TIMES
तिनदा घडी घाला



बंद बाजूची घडी   हुड फोल्ड,
Outside reverse fold
or Hood fold



मोकळ्या बाजूची घडी, पॉकेट फोल्ड,
Inside reverse fold
or pocket fold



बंद बाजूची घडी,
हुड फोल्ड किंवा आउटसाइड
रिव्हर्स फोल्ड



मोकळ्या बाजूची घडी, आतील बाजूने
केलेली घडी किंवा पॉकेट फोल्ड



## रिव्हर्स फोल्डस् उलटून करण्याच्या घड्या

प्रत्येक घडीला एक बाजू बंद असते व एक बाजू मोकळी असते. यासाठी उलटून टाकण्याच्या घड्यांचे दोन प्रकार असतात. बंद बाजूची घडी हूड फोल्ड किंवा आउट साइड रिव्हर्स या नावांनी उल्लेखितात. मोकळ्या बाजूची घडी इनसाइड किंवा पॉकेट फोल्ड या नावाने ओळखतात. या दोनहि घड्या चांगल्य आल्याशिवाय ओरिगामीच्या अनेक कलाकृति येत नाहीत. आकृति पाहून याचा सराव करावा.




You can practise Rverse Holds with a traingular piece of paper.

रिव्हर्स फोल्ड
Reverse Folds

Head - If the colosed side is up the effect is good.



### पायासाठी घडी

Foot Stability is poor if the closed edge of the fold is down ward.



पायासाठी बंद बाजूला घडी घेतली तर खाली टोक येते. हीच घडी जर प्रथम मोकळ्या बाजूला घेऊन नंतर घडी घालून मागे घेतली तर पायाला स्थिरता येण्यास घडीचा उपयोग होतो व कलाकृति उभी राहू शकते. शिवाय पायाला योग्य असा आकार येतो.






Pull out
बाहेर ओढा



Pull out
बाहेर ओढा

सफाईदार घडी घाला बाहेर दुमडा
Crese well, Fold outward



सफाईदार घडी घाला आत दुमडा
Crese well, Fold inward.



## Symbols and Folding Techniques



**Swivel**

This is similar to a pleat, but instead of making a parallel fold, the second fold meets the first at the edge of the paper and then goes off at an angle.



**क्रिंप**

क्रिंप ही एकावर एक येणारी घडी आहे. फरक एवढाच की घातलेल्या दोन्ही घड्यांची टोके बाजूला एकत्र मिळतात.





**स्कॅश**

स्कॅश ही अत्यंत महत्त्वाची घडी असून ती सरावाने घालता येते. प्रथम घडी घालून खुणा घेऊन नंतर खुणांच्या आधाराने घडी उचलून दाबावी. दाबलेल्या बाजूंच्या मध्ये फट राहू नये.





**Squash Fold**

Start with a Water Bomb Base

1. Make the Valley Fold indicated at the base of the flap.
2. Hold the flap upright, and squash it.
3. Squashing half done.
4. Squash Fold completed, with centre crease exactly in line.

Join corner to corner then run the finger and thumb of one hand to the side. Return this hand to the centre.





टोकाला टोक जुळवून तिरपा मध्य काढा.

घडी सफाईदार करा.




बाजूला बाजू जुळवून आडवा मध्य काढा.
बोटाने घडी सफाईदार करा.

A Rabbit's Ear procedure can be applied to any flap of paper.



**रॅबिट इअर**

१) मध्य काढा २) बाजू मध्यापर्यंत दुमडून खूण घ्या ३) दुसरी बाजू मध्यापर्यंत दुमडा ४-५) टोकाची घडी घालत दोन्ही बाजू खुणांच्या वर दुमडत जा ६) टोक बाजूला दुमडा. दोन्ही बाजूंच्या मध्ये फट नको.

1. The standard mnarkings for a Rabbit's Ear.
2. Valley Fold.
3. Valley Fold made; unfold.
4. Valley Fold again.
5. Valley Fold made; unfold
6. Fold the flap into the crease made, and fold the point over to the left.
7. Half done.
8. Rabbit's Ear completed.

**सिंक**

१) वॉटर बॉंबची घडी घाला २) घडी दुमडून खूण घ्या ३) घडी उलगडून मधला भाग आत-दाबत आकृति पाहून त्याप्रमाणे घडी घ्या. चारी बाजूंच्या आत घड्या घालत गेल्यास घडी जमते.



A method of pushing in a point or edge between four layers of paper. The first diagram (1) shows the instruction. when this fold is used in the creation of a particular model. This starting point is a waterbomb base. see page 22. (2) First mark the fold line by a simple valley fold and return (3) Open up the paper and flatten the point. Make the square of crease lines into mountain folds and squeezing adjacent mountain folds together. push the centre point down. The final diagram (4 shows the completed sink.



## इनसर्ट

टोक न दुमडता घातलेल्या घडीच्या आत सरकवून देता येते. यामुळे ते वर दिसत नाही. प्रथम घडी घालून उलगडून खूण घ्यावी व त्या खुणेवर घड्या वर उचलून टोक आत घालावे. यामुळे घडीला नवीन रूप येते.

## कर्लिंग

पाकळ्या वळवताना याचा उपयोग होतो. मिश्या, शेपूट यांना थोडे वळण दिले तर कलाकृति अधिक चांगली दिसते.

## पुलिंग

एकाकडे एक घड्या घालून बंद बाजूने त्या जर थोड्या ओढल्या तर घडीला बाकदारपणा येतो. याचा उपयोग प्रामुख्याने झिंगा बनवताना होतो.

## शिडीची घडी

१) टोक प्रथम तुटक रेषेवर आत दुमडा. २) पुन्हा बाहेर दुमडा. या घडीचा उपयोग नको असलेला भाग आत घालण्यास होतो.

## रॅबिट इअर

१) मध्य काढा २) बाजू मध्यापर्यंत दुमडून खूण घ्या ३) दुसरी बाजू मध्यापर्यंत दुमडा ४-५) टोकाची घडी घालत दोन्ही बाजू खुणांच्या वर दुमडत जा ६) टोक बाजूला दुमडा. दोन्ही बाजूंच्या मध्ये फट नको.

## पिंच फोल्ड

पिंच म्हणजे चिमटा केधे. यासाठी प्रथम तुटक रेषांवर घड्या घालून खुणा घ्याव्या, नंतर टोक चिमटावे व पुढील खुणांवर आत घालत दाबावे. ही घडी करून पाहाण्यानेच येत जाते. खूप सरावाने ती सहज बसते.



**Inserting :** Hold and return to original position. Then insert inside.

**Curling :** As a finishing touch for flower petals, animal tails, or moustaches, curling is most effective.

**Pull Fold :** This fold, used to make the tip part of an angle slender, is often found in tails of origami animals or in the heads of origami human figures. In some cases, the paper is pulled forward as in A and B in others the paper is tucked inward. In either case, the fold is easier to make if proper creases are made beforehand.

**Pulling :** Interesting effects result from pulling series of stairstep folds. Aserics of pocket folds produces a curved form

**Stairstep Fold :** As the name indicates, the step fold is made by combining a valley and a peak fold to form a kind of pleat.

**Pinch Fold :** Like the pull fold, the pinch fold is used to narrow of a corner, though in the latter there is no pleat or step as there is in the former. The fold is complete at step 2; depending on the nature of the paper, this fold can produce great stability.

The narrow tip can, however, be folded further to produce the shape in step 3.

## चांदणी

**भाग : १**

१) दहा सेंटिमीटर लांबी-रुंदीचा चौकोन घेऊन कागदाची टोके जुळवून घडी घाला.

२) घडीची एक बाजू बंद बाजूपर्यंत दुमडा.







३) तयार घडीची मागील बाजूने टोके जुळवा.

४) वरील बाजूचे टोक बाणाच्या दिशेने बाहेर काढा. तयार भागामध्ये भाग दोन तयार करून अडकवा.









**भाग : २**

१) दहा सेंटिमीटर लांबी-रुंदीचा चौकोन घेऊन कागदाला घडी घाला.

२) मोकळ्या बाजूने दोन्ही कोपरे दुमडा.

३) तयार घडी उलट बाजू वर करून भाग १च्या घडीत सरकवून चिकटवा.









## STAR

This star needs 2 squares of 10 cms. each.

Part - 1 : Fold the two opposite sides together. Fold up the two lower corners from the open side and turn side and turn the model.

Part - 2 : (1) Bring opposite corners together

(2) Fold down only the top layer on the dotted line.

(3) Fold backwards the model on the center line and at the same time pull the corner marked X outwards.

Now turn part two to make it stand and slide part one into part two.









## STAR

Take three squares of the same size, and fold each one as shown on the diagonal. Then slide one into the other as shown in figure 3 to reach figure 4. Then stick the third square on the figure as shown in the diagram.







## चांदणी

तीन सारख्या लांबी-रुंदीचे कागद घेऊन टोकाला टोक जुळवून आकृतीत दाखविल्याप्रमाणे दोन घड्या एकात एक गुंतवा. तिसरी घडी चिकटवा.

## प्राण्यांची तोंडे :



### कुत्रा

कागद जाडसर १५ सें. मी. चौकोन

१) कोपरे जुळवून घडी घालावी २) दोन कोपरे दुमडून कान करावे. टोक दुमडावे. नाक, डोळे रंगवून कुत्र्याचे तोंड तयार करावे.

### लांडगा

कागद चौकोनी १५ सें. मी. लांबी रुंदीचा

१) कागदाची टोके जुळवावी २) बाजू बाणाच्या दिशेने दुमडावी ३) पुन्हा घडी उलगडावी म्हणजे खूण मिळेल. याप्रमाणे दुसरी बाजू दुमडून खूण घ्यावी ४) आकृतीत दाखविलेले दोन त्रिकोण कापावे ५) तुटक रेषेवर कोपरे दुमडावे ६) दोन्ही टोके वर घ्यावी ७) वरील टोक खाली दुमडावे ८) तोंडाचा आकार कात्रीने कापावा. नाक-डोळे रंगवावे.



### DOG

15 cm Square thick paper

1. Join the corners & fold the peper.

2. Fold the corners to make ears.

3. Fold the end. Prepare face of the dog with the help of colours.

### WOLF

15 cm. Square paper of any Colour.

1. Crease the squrare diagonally by bringing two opposite corners together.

2. Fold the side as shown by arrows.

3. Unfold the side so as to get a crease. Get a sign by folding other side.

4. Cut two triangles as shown in the Figure.

5. Fold the corners on the dotted line.

6. Take both ends upside.

7. Fold the upper end below.

8. Cut figure of the face with scissors. Use colour for nose and eyes.





## मांजर

कागद १५ सें. मी. चौकोन

१) चौकोनी कागदाची टोके जुळवून घडी घालावी. घडीचे तीन भाग मोजावे. वरील टोक तिरप्या भागाइतके दुमडावे.

२) व ३) दोन्ही कोपरे तुटक रेषेवर दुमडावे. कलाकृती उलटी करून नाक-डोळे रंगवावे.

## ससा

कागद १५ सें. मी. चौकोन

१) कागदाची टोके जुळवून मध्य काढावा व टोक मध्यरेषेपर्यंत दुमडावे २) व ३) दुमडलेली घडी मध्य रेषेपासून पुन्हा दुमडावी ४) दोन्ही टोके खालील टोकापर्यंत दुमडावी ५) टोके तुटक रेषेवर पुन्हा वरच्या टोकाकडे पण थोडी तिरपी दुमडावी ६) बाजूचे कोपरे आत दुमडावे ७) खालील टोक वर नेऊन चेहरा रंगवावा.

## CAT

15 cm Square

1. Join the corners and fold the square paper.

Make three parts of folded portion fold the upper end upto starting portion.

2 & 3 Fold two ends as the dotted line. Reverse the position and colour the nose & eyes.

## RABBIT

15 Cm. Square paper.

1. Find out the Centre by bringing two corners together. Fold one corner upto Central line.

2. & 3. Fold again the folded portion upto Central line.

4. Fold the ends again on the dotted line towards upper ends little slanting.

6. Tuck the corners inside.

7.Bring the lower end up and Colour the face.



## झाड

कागद १५ सें. मी. हिरव्या रंगाचा

१) खालील कोपरा मध्याच्या खालील तुटक रेषेवर वर दुमडावा २) तयार खोड घडीवर चिकटवून बाजू दुमडाव्या व कोपरे आत घालावे.

## खोड

कागद १५ सें. मी. चौकोन खोडाच्या रंगाचा

१) कागदाचा तिरपा मध्य काढून दोन बाजू तिरप्या मध्यापर्यंत दुमडाव्या २) खालील टोक वर दुमडून पुन्हा बाजू मध्यापर्यंत दुमडाव्या. टोके आत घालावी.







## घर

कागद – चौकोनी फार लवचिक नसावा. एक बाजू रंगीत असावी.

कागदाच्या बाजू जुळवून आडवा व उभा मध्य काढावा.

१-२) रंगीत बाजू वर घ्यावी. एक बाजू पुढून व एक बाजू मागून मध्यापर्यंत दुमडाव्या. कडामध्ये दुमडाव्या ३) सुट्टी टोके आतून बोट घालून बाहेर ओढावी ४) घड्या व्यवस्थित बसवून संपूर्ण कलाकृति उलट करावी ५) तयार घराचा दरवाजा व खिडकी रंगवावे.













## TREE

One brown coloured 15 cm square for the trunk.

One green coloured 15 cm square for the tree.

## TRUNK

1. Fold the sides to the diagoncal and the bottom corner up.
2. Again fold the sides to the centre
3. Tuck the lower flaps inside.

## TREE

1. Fold up the bottom corner on the dotted line.

To make the tree place the trunk as shown in figure 2 and fold the sides so that they overlap. Finally tuck the flap inside. (fig. 3)

## HOUSE

One coloured square of thick paper. 15 cms.

1. Fold the opposite sides to the centre and make a vertical crease like Keeping the coloured side towards you fold the top edge behind to the centre line and the lower edge foreward to the centre line.
2. Fold the sides to the centre.
3. Insert your finger and pull out the corners. Press well.
4. Turn the model around.





## घर

कागद : १५ सें. मी. चा चौकोनी. कागद न फाटणारा व आकर्षक रंगाचा.

१) चौकोनी कागदाच्या बाजू जुळवून मध्यावर घडी घाला २-३) वरील घडीचा मध्य काढून दोन बाजू मध्यापर्यंत दुमडून घडी बाहेर उलगडा ४) दारे-खिडक्या रंगवा.

One 15 cm. coloured square.

1. Keeping the white side facing you fold the square in half.
2. Fold the sides to the centre.
3. Lift the upper flaps and squash the corners as shown.
4. The completed house with doors and windows painted.



## घर

कागद : १५ सें. मी. चौकोनी.

१) चौकोनाची घडी घाला २) बाजू जुळवून घडीचा मध्य काढा. दोन्ही बाजू मध्यापर्यंत दुमडा. ३) बाणाच्या दिशेने घडीवर दाब देऊन बाजू बाहेर काढा ४) तयार घडीचा मागचा भाग मागून वर दुमडा ५) तुटक रेषेवर कोपरे दुमडा ६) टोके आत घाला ७) कलाकृति उलटावी. घर तयार होईल.

One 15 cm coloured square.

Fold the peper as per house No. 2 up till figure 3.

4. Fold the back flap behind on the dotted line so as to get figure 5 (mountain fold).
5. Fold down the top sides.
6. Tuck the corners inside and get figure 7. So that the roof is straight.
7. Turn the model around.
8. The house is ready. You can make a scene with different coloured and size houses.

१ 1



२ 2





३ 3



४ 4



## कोलांटीवाला

कोलांट्या मारताना खूपच गंमत वाटते. कागदाच्या एका लहानग्या तुकड्याला घड्या घालून जेव्हा कोलांटीवाला तयार होतो तेव्हा अधिकच गंमत वाटते.

बाणाच्या आकाराचा जाड कागदाचा चौकोनी तुकडा घ्या. टोके जुळवून मध्यरेषा काढा. कागद पुन्हा उलगडा.

१) बाणाच्या दिशेने तुटक रेषेवर घडी घालून कोपरे मध्यरेषेपर्यंत दुमडा २) टोकाची घडी घालताना टोक थोडे पुढे येईल याची काळजी घ्या ३) पुन्हा घडी घालाल ती पहिल्या घड्यांच्या कडेपर्यंत असावी ४) दोन्ही बाजू मध्यरेषेपर्यंत दुमडून जी खूण मिळते तेथपर्यंत खालील दोन कोपरे आत दुमडा. कडेच्या घड्या उभ्या करा. ही तयार कलाकृती उभी करण्याचा प्रयत्न केलात तर ती एक कोलांटी उडी घेते. म्हणून या कलाकृतीला कोलांटीवाला म्हणू या. पण या कलाकृतीचे मूळ नाव आहे कोटॉंग कॉंग.

## TUMBLING TOY

A slightly thick 10 cms. or less square.

(1) Fold the two adjacent corners to the center.

(2) Bring down the corner to a point slightly beyond the center line.

(3) Fold the folded side to the center line.

(4) First fold the sides to the center - unfold and then fold corners to the crease.

Hold it erect and see it tumbles.

१ 1



२ 2



३ 3





४ 4





## Tumbling toy

Use a square of paper. Start by folding opposite edges together in turn to mark the horizontal and vertical centre creases.

Fold the top edge to the centre, crease and unfold. Fold the bottom edge to the centre and leave folded.

Fold in the four corners to the newly formed horizontal line.

Fold in the top and bottom edges to the horizontal lines.

Fold the left and right edges to the centre; crease and then raise the sides.

The completed toy. Stand it on a flat surface, tap it lightly with a finger and, as you would expect, it will fall forward.

## प्रकार – २

१) वरील बाजू मध्यापर्यंत दुमडून, उलगडून खूण घ्यावी. खालची बाजू मध्यापर्यंत दुमडून तशीच ठेवावी २) चारी कोपरे दुमडावे ३) खालची व वरची बाजू दुमडून पट्ट्या कराव्या ४) दोन्ही बाजू मध्यापर्यंत दुमडाव्या, खुणा घ्याव्या व बाजू उभ्या कराव्या. कलाकृति उभी करताच कोलांटी होते.
















## बाण

थोडा जाडसर चौकोनी कागद घ्यावा.

१५ सें. मी. लांब व १५ सें. मी. रुंद असा कागद बेताचा होतो.

१) कागदाच्या वरच्या बाजूने तीन सेंट पट्टी दुमडावी २) दोन्ही कोपरे मध्यापर्यंत दुमडावे ३) मागील बाजूने घडी दुमडावी ४) तुटक रेषेवर पुढील भाग पुढे व मागील भाग मागे दुमडावा ५) पुन्हा एकदा तुटक रेषेवर बाणाच्या दिशेने मागील बाजू मागे व पुढील बाजू पुढे दुमडल्यावर बाण उडविण्यासाठी तयार होतो.

## ARROW

A square of thick paper strip on the top side of the square.

(1) Fold down a small strip on the top side of the square.

(2) Fold down the two corners to the center.

(3) Fold in half behind.

(4) Fold upper flap on the dotted line in front repeat behind.

(5) Again fold in front and bach on the dotted line. Hold from below and throw.








## हेलिकॉप्टर

१) १॥ ते २ सें. मी. रुंद व १२ ते १३ से. मी. लांब अशी कागदाची पट्टी घ्यावी. कागद फार विशविशीत नसावा.

बाजू जुळवून मध्य काढावा व खालून दोन वेळा दुमडून पट्टी करावी. वरून बरोबर मध्यभागी पट्टीच्या मध्याच्या खुणेपर्यंत कापावे २) पट्टीच्या मध्यभागी दोन्ही बाजूने तिसरा भाग कात्रीने कापावा व खालील भागाच्या बाणाच्या दिशेने बाजू दुमडून आकार द्यावा. वरील कापलेल्या पट्ट्या थोड्या बाजूला घेऊन हेलिकॉप्टरवर उडवून गंमत पहावी.

चौकोनी कागदाचे कोपरे दुमडून ओरिगामी कलाकृती.

## HELICOPTER

2 cms. by 13 cms. strip of paper.

Fold the sides together and crease to find the vertical central line unfold. Fold the lower edge twice to four and strip. Cut along the middle from the top up till half the length of the paper. Make slits at the middle from both the sides as shown.

Fold the sides one over another.

Bend the top two strips - one forward one backward and let the helicopter fly down from your balcony.

## ऑलिंपिक रिंग्ज

कागद : ६ इंच लांबी-रुंदीचे पाच चौकोन.
रंग : निळा, पिवळा, काळा, हिरवा, लाल.

कागदाच्या बाजू जुळवून आडवा-उभा-मध्य काढा व चारहि बाजू पुन्हा मध्यापर्यंत दुमडून खुणा घ्या. यामुळे कागदाचे १६ भाग पडतील. या सोळा तुकड्यांची युनिटस् तयार करा. अशा प्रकारे तयार होणाऱ्या कलाकृतीस युनिट ओरिगामी म्हणतात.

१) कागदाला मध्यभागी घडी घाला २) घडीचा मोकळ्या बाजूने एक कोपरा मागे दुमडा. दुसरा बंद बाजूचा कोपरा पुढून मध्यापर्यंत दुमडा ३-४) पुढच्या बाजूचा कोपरा उभा करून मधे मोकळा करून बोटाने घडीवर दाबा ५) तयार युनिट ६) १५ युनिटस् तयार करून एकात एक गुंतवून रिंग तयार होते. युनिटस् सुटू नयेत म्हणून बारीकसा फेविकोलचा ठिपका युनिटच्या टोकाला लावा.

## Olympic Rings

Five Squares of
Paper - Length 6", Bredth 6".
Colour - Blue, Yellow, Black, Green and Red.

## Green or Red.

Find the Centre of the paper by folding it horizontally and perpendicularly after joining the sides of the paper; obtain signs again by joining the four sides upto the centre. Thus the paper will be divided in 16 parts. Form units out of these 16 parts. It is called 'Unit Origami'.

1) Fold the paper at the centre.

2) Fold one corner at the open side at the back.

Fold another corner at the close side upto the centre.

3-4) Erect the front corner and press it on the fold.

5) Ready unit.

6) 15 units should be joined into one other.

Paste a small drop of fevicol with a view that the units should not detach.




## फूल

हायड्रेनजिया : ४ सें. मी. लांबी-रुंदीचे रंगीत चौकोनी कागदाचे तुकडे कापावे.

१) कागदाला रंगीत बाजू वर ठेवून घडी घालावी २) घडीची पुन्हा घडी घालून उलगडावी व मध्याची खूण घ्यावी ३) बंद बाजू वरील घडीच्या मध्यापर्यंत दुमडून दुमडलेली घडी ठेवून कागद उलगडावा ४) उलगडलेल्या कागदाची मध्यावर घडी घालावी ५) वरील घडीला घडी घालून मध्याची खूण घ्यावी व घडी उलगडावी ६) बंद बाजू वरील खुणेपर्यंत दुमडावी ७) घड्या मागील बाजूला ठेवून कागद उलगडावा ८-९) प्रत्येक घडीचा कोपरा कसा दुमडावा ते मोठा आकार करून दाखविण्यात आले आहे १०) चारी कोपरे दुमडून आकार द्यावा ११) टोके मागे दुमडावी.

तयार फुलांचा उपयोग करून फांद्या, महिरपी, सीन बनवावे.

## HYDRENGIA FLOWER

4 cms squares of coloured paper.

1) Keeping the coloured side facing you fold the square in half.

2) Again fold to get a horizontal crease.

3) Fold the closed edge till the crease and fold up the top layer on the crease formed so that you get a pleate see figure 4.

4) Now fold the model in half.

5) Fold again and open to get the central verticle crease.

6) Now fold the upper layer to the left on the dotted line.

7) Turn the model.

8-11) Each corner has to be folded as shown in the magnified diagrams.

12) After turning over the model as in fig. 11 slightly fold the outer corners to give shape to the flower.

















## FISH

One coloured 15 cm. square

1. Keeping the coloured side up fold the square in half.
2. Fold both the top corners to the centre line.
3. Lift up the triangles and squash flat and press.
4. Fold behind on the dotted line and turn the model around.
5. Fold up the lower edge on the dotted line. Repeat behind.
6. Fold up the two corners. Repeat behind.
7. Open out at the middle as when making a boat and bringing the sides together get the fish shape.

## मासा

कागद १५ से. मी. लांबी-रुंदीचा चौकोन

१) कागदाला बाजू जुळवून मध्यभागी घडी घाला २) बंद बाजूने घडीचे कोपरे दुमडा ३) घडीमधून मोकळी करून उभी करा, व दाबा ४) अर्धा भाग मागे दुमडा. संपूर्ण कलाकृति पालथी करा ५) तुटक रेषेवर खालील बाजू एक पुढून व एक मागून दुमडा ६) तुटक रेषेवर टोके वर घ्या. दोन पुढून व दोन मागून ७) मध्यभाग मोकळा करून होडीप्रमाणे घडी दाबा व माशाचा आकार द्या.











## जपानी पंखा

आकर्षक रंगाचा लांबट चौकोन

लांब बाजूने कागदाचा मध्य काढावा. एक बाजू पुढून मध्यापर्यंत दुमडावी. एक बाजू मागून मध्यापर्यंत दुमडावी. पंख्याच्या घड्या घालाव्या. एका बाजूचे पंखा उलगडावा. एका बाजूने बांधावा.

## JAPANESE FAN

1. Rectangular paper of attractive Colour.
2. Find out the centre of the side of the paper lengthwise.
3. Fold one side upto the Centre. Fold other side upto the centre from behind.
4. Crease the fan well.
5. Open the fan from one side and tie from the other side.

## होडी

कागद मजबूत २० से. मी. लांबी-रुंदीचा

१) चौकोनी कागदाच्या बाजू जुळवून आठवा मध्य काढावा. दोन बाजू मध्यापर्यंत दुमडाव्या २) चारी कोपरे मध्यापर्यंत दुमडावे ३) चारी कोपरे पुन्हा मध्यापर्यंत दुमडावे. बाजूला कोपरे एकावर एक चढतात ४) बाजूचे कोपरे मध्यापर्यंत दुमडून होडी उलट बाजूला उलटावी.

## BOAT

A square 20 cm. of strong paper.

(1) Fold the opposite sides to the centre and then fold the four corners to the centre.

(2) Once again fold the four corners to the centre. The sides will overlap.

(3) Fold the opposite corners to the centre.

(4) Fold behind on the center line and

(5) Turn the model inside out.





## छपरी होडी

कागद चिवट ३० सें. मी. लांबी-रुंदीचा चौकोन. कागदाचे आडवे, उभे व तिरपे मध्य काढावे.

१) चारी कोपरे मध्य बिंदूपर्यंत दुमडून पुन्हा उलगडावे व खुणा घ्याव्या २) समोरासमोरचे दोन कोपरे वरच्या बाजूने वरील मिळालेल्या खुणेपर्यंत दुमडून पट्टी खुणेवर दुमडावी. राहिलेले दोन कोपरे उलट बाजूला दुमडून पट्टी खुणेपर्यंत दुमडावी. ३) वरीलप्रमाणे तयार झालेली चौकोनी घडी पालथी घालावी. पुढील संपूर्ण कृति होडीप्रमाणे करावी. छप्पर वरून उचलावे.

## BOAT WITH HOOD

One square at 30 cms. of strong paper.

Crease the square so as to get the diagonal, horizontal and vertical creases by folding the opposite sides and corners together. Fold the four corners to the centre to get creases only. Then fold two opposite corners to the crease line and the other two opposite corners behind. Fold all four sides to the center.

Turn the model around and then proceed as shown in the previous boat.








## खेळगडी

कागद लहान व आकर्षक निवडावे. चौकोनाचा अर्धा असे तीन तुकडे लागतात. डोक्यासाठी चौकोनाचा चौथा भाग लागतो.

डोके : डोक्यासाठी एका बाजूने काळा रंग असलेला कागद वापरावा. शरीरासाठी वापरलेल्या कागदाचा चौथा भाग कागद वापरावा. टोके जुळवून मध्य काढावा. आकृती पाहून डोके तयार करावे. आकृतीत वेगवेगळे प्रकार दाखविले आहेत.

### शरीर

१) चौकोनाचा अर्धा भाग मध्ये दुमडून मध्य काढावा २) चारी कोपरे मध्यापर्यंत दुमडावे ३-४) तयार घडीचे पुन्हा चारी कोपरे दुमडावे ५) तयार घडीची मध्यभागी घडी घालावी. याप्रमाणे तीन घड्या तयार करून आकृतीत दाखविल्याप्रमाणे शरीर तयार करावे. हातापायाला आकार द्यावा.

## PLAYMATE

### BODY

For making the body you need three rectangles or three 1/2 squares and one quarter square for the face.

1) Take the 1/2 square and make a horizontal crease only.

2) Fold four corners to the centre.

3 & 4) Again fold four corners to the centre.

5) Fold the model in half.

6) The completed model.

Make three models like this and arrange them to form the body as shown in the figure.

The hands and feet have to be given shape as shown in the diagrams.

### FACE

1/4 square of the square size taken for the body, should be taken (preferably black colour). Three different types of faces are shown. The face should then be attached to the body with a little glue.









# परी

## शरीर

कागद १२ से. मी. लांबी-रुंदीचा चौकोन

१) कागदाचा तिरपा मध्य काढून बाजू मध्यापर्यंत दुमडा २) खालील टोक वर घ्या ३) संपूर्ण घडी पालथी करा.

## पंख

१२ सें. मी. लांबी-रुंदीचा चौकोनी कागद घेऊन आकृतीत दाखविल्याप्रमाणे पंख्याची घडी घाला. तयार घडी मागील बाजूस दुमडून पंख पसरवा.

डोके–९ सें. मी. लांबी-रुंदीचा एका बाजूने काळा असलेला कागद वापरून वर दाखविल्याप्रमाणे डोके तयार करा. डोके, धड व पंख मिळून परी तयार करा.

## FAIRY OR ANGEL

BODY - 12 cms. square.

(1) Find the diagonal crease and fold sides to the center.

(2) Fold the top corner up.

(3) Turn the model around.

## WINGS

Take a 12 cm. square and pleat the paper from both top and bottom sides to the center. Fold the completed model backwards to form the wings.

Make the face a shown for the basic figures taking 1 cms. square





## खुर्ची

बाकासाठी क्रमांक तीनपर्यंत घडीची एक बाजू बाकाप्रमाणे उलगडून चौथा हिस्सा भाग कापून टाकावा.

पुन्हा घडी दुमडावी व बाकाप्रमाणे बाजू उलगडावी. मधली घडी वर घेऊन बाजू दुमडून घडी खाली घ्यावी. खुर्ची तयार होईल.





## CHAIR

Fold as for bench till figure 3.

Squash fold only one side and cut off the otherside as shown.

Then fold side again as for bench. Lift up the middle part and fold in the sides to complete the chair.



९ 1

② ②

③ ③

## बाक

१) १५ से. मी. लांबी-रुंदीचा चौकोनी कागद घेऊन त्याचे आडवे-उभे मध्य काढून घडी घालावी २) घडीच्या दोन्ही बाजू मध्य रेषेपर्यंत दुमडाव्या ३) वरील सुटा पदर बाहेर घ्यावा ४) घडीचा मधला भाग वर दुमडून बाजू पुन्हा मध्ये रेषेपर्यंत दुमडाव्या ५) हलकेच वर दुमडलेली मधली घडी खाली ओढावी. बाक तयार होईल.



४ 4



५ 5



## BENCH

15 cm square of any colour.

1. Make a vertical and a horizontal crease and fold the square in half.
2. Fold sides to the centre.
3. Crease only the corners - lift up and take the flaps outwards and simultaneously squash the triangles.
4. Take the upper central flap, fold till the centre and again fold up to form a strip which will form the seat of the bench. Then fold the sides to the centre.





कमळाची आकृती पहा व कलाकृती पूर्ण करा.

Follow the diagram of lotus flower & complete the design.







